आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कौशल्य विकास योजनेसाठी निधी वितरण
(लेखाशीर्ष २२३० ए८०८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.११ (भाग-१)/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०६ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३.
२) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाची नस्ती क्र.कौविउ-२०२२/ प्र.क्र.११४/२०२२/कौशल्य-१.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या प्रधानमंत्री कौशल्य विकास योजना ३.० (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) यासाठी महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या माहे डिसेंबर (हिवाळी) अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला एकूण रु.५१.७३ लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२३० - कामगार, सेवायोजना व कौशल्य विकास या मुख्य लेखाशिर्षांतर्गत प्रधानमंत्री कौशल्य विकास योजना ३.० (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) या योजनेसाठी महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ च्या माहे डिसेंबर (हिवाळी) अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला एकूण रु. ५१.७३ लाख इतका निधी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२२-२३ | सदर शा. नि.द्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| प्रधानमंत्री कौशल्य विकास योजना ३.० (१०० टक्के केंद्र हिस्सा) | २२३० ए८०८ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ५१.७३ | ५१.७३ |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.५१.७३ लाख (अक्षरी रुपये एकावन्न लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतका निधी** प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३५-२०२३/व्यय-१४, दि.१४.०२.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२७१३०१३६५३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.03.08 12:37:13 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.